अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्क मान्यता)
अधिनियम २००६ नियम २००८ व सुधारित नियम २०१२ नुसार

# वन कार्ययोजना आराखडा

सामुहिक वनहक्काचे संरक्षण व व्यवस्थापन योजना

## ग्रामसभा- निमनवाडा

**कालावधी**
**(सन 2022-23 ते 2031-32)**




**तालुका - धानोरा**
**जिल्हा – गडचिरोली**

| क्रमांक | अनुक्रमाणिका | पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|

# ठराव

**ग्रामसभेचे नाव:** निमनवाडा
**ग्राम पंचायतीचे नाव:** निमनवाडा
**तालुक्याचे नाव:** धानोरा
**जिल्हा:** गडचिरोली

**दिनांक:**

**ठराव:**

**क.)** असे घोषित करण्यात येते की, यासोबत जोडलेल्या व्यवस्थापन आराखड्यावर चर्चा झाली आहे आणि सदर व्यवस्थापन आराखडा आजपासून. 10 वर्षे या कालावधीसाठी स्वीकारण्यात आला आहे.

**ख. )** असेही घोषित करण्यात येते की, सोबतचा आराखडा वन विभागाच्या आराखडा / सूक्ष्म आराखडा / चालू आराखडा (Management Plan / Micro Plan / Working Plan) यांच्याशी खालीलप्रमाणे सुसंगत राहिल

**i)** सोबतचा व्यवस्थापन आराखडा यापुढे वन विभागाच्या वनव्यवस्थापन आराखडा / सूक्ष्म आराखडा / चालू आराखडा यामध्ये अंतर्भूत असेल.

**ii)** वन विभागाच्या व्यवस्थापन आराखडा / चालू आराखडा / सूक्ष्म आराखडा यातील या सामूहिक वन संसाधन व्यवस्थापन आराखड्याशी सुसंगत नसलेला भाग यापुढे वगळण्यात आला आहे असे समजण्यात येईल. वन विभागाने विनाविलंब याबाबत खात्री करावी.

**ग.)** सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समिती यांना या आराखड्याची प्रत स्थानिक जिल्हा वन संरक्षक यांना पाठविण्याबाबत सूचित करण्यात येत आहे.

**घ.)** याद्वारे असेही घोषित करण्यात येते की, ही ग्रामसभा जेंव्हा गरज भासेल तेंव्हा हा व्यवस्थापन आराखडा सुधारीत करणे, तसेच वन विभागाच्या सुक्ष्म / चालू आराखड्यातील भाग सुधारीत करणे याबाबतचा हक्क राखून ठेवत आहे.

**च.)** यानंतर असेही घोषित करण्यात येते की, कोणीही या सामूहिक वनहक्क क्षेत्रामध्ये व्यवस्थापन, वृक्षारोपण, वृक्षतोड आणि वनांचे पुनरुज्जीवन यासारखे उपक्रम या ग्रामसभेच्या पूर्व सूचित परवानगीशिवाय घेणार नाही.



# 1. आमच्या गावाविषयी

## 1.1. प्रस्तावना

इंग्रजांच्या वसाहत काळात तसेच स्वातंत्र्यानंतर वनांच्या एकत्रीकरणात आदिवासी व वनात पिढ्यानपिढ्या वास्तव्य करणाऱ्या जन समुहावर झालेला ऐतिहासिक अन्याय दूर करण्यासाठी करण्यात आलेला भारत सरकारचा कायदा "अनुसुचित जमाती व इतर पंरपंरागत वननिवासी ( वन ह्क्क मान्य करणे) अधिनीयम 2006 नियम 2008 व सुधारित नियम 2012" नुसार कलम 3(1) नूसार सामुहिक वन हक्क मिळण्याचे अधिकार प्राप्त झाले. यामध्ये अनुसूचित जमाती किंवा इतर पारंपारिक वननिवासी यांना सामुहिक वन हक्कांतर्गत निस्तार सारखे हक्क, गावाचे सिमेंतर्गत किंवा सिमेबाहेर पारंपारिकरित्या गोळा केले जाणारे वन उत्पादन, त्याचा वापर करणे किंवा त्याची विल्हेवाट लावणे यासाठी स्वामित्व हक्क, पाण्यामधील मत्स्य व अन्य उत्पादने, चराई करणे, पारंपारिक मोसमी साधनसंपत्ती मिळविणेइत्यादी हक्क आहेत.

अनुसुचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वन हक्काची मान्यता) अधिनियम 2006 अस्तित्वात आल्यानंतर अनुसुचित जमाती व अन्य पारंपारिक वननिवासी (वन हक्काची मान्यता)नियम 2008 व सुधारित नियम 2012 तयार करण्यात आले.सुधारित नियम 2012 चे नियम 4(1)(च) नुसार अनुसुचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासीं यांच्या फायद्यासाठी अश्या सामुहिक वन संसाधनाचे शाश्वत व समसमान व्यवस्थापन करण्यासाठी सामुहिक वन संपत्तीचे संवर्धन करण्याची व तीचे व्यवस्थापन करण्याची योजना तयार करणाऱ्या वन विभागाच्या सूक्ष्मदर्शक आराखडा किंवा कार्यआयोजना किंवा व्यवस्थापन योजनाबरोबर संवर्धन व व्यवस्थापन योजना समितीला करणे आवश्यक वाटेल अश्या फेरबदलाविषयी एकत्रीकरण करणाऱ्या खंड (ङ) नुसार गठीत करण्यात आलेल्या समितीचे संनियंत्रक व नियंत्रण करणे अशी जबाबदारी ग्रामसभाना

देण्यात आली. कायद्यातील नियम 4(1)(च) च्या तरतूदीनुसार कर्तव्ये पार पाडण्यासाठी ग्रामसभा तिच्या सदस्यामधून नियम 4(1)(ङ) नुसार स्थापन केलेल्या समितीला "सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समिती" (Community Forest Rights Management Committee)असे संबोधण्यात यावे. सदर समितीचे संनियंत्रन व नियंत्रन ग्रामसभा करेल. ग्रामसभेतील सामूहिक वन संपत्तीचे संवर्धन व व्यवस्थापन योजना तयार करणे, नैसर्गिक साधन संपत्तीच्या व्यवस्थापनातून प्राप्त होणारा महसुल तसेच शासनाकडुन प्राप्त होणारा निधी यांचे बँक खात्यामार्फत संनियंत्रण करणे, जमाखर्चाचे लेखे व लेखापरिक्षण ठेवणे इत्यादी प्रशाकीय बाबी पार पाडण्याकरीता सदर समिती ही वनहक्क कायद्याच्या अंमलबजावणीसाठी ग्रामसभेची कार्यकारी समिती असेल.त्यामुळे सामुहिक वन हक्कांतर्गत प्राप्त क्षेत्राचा आराखडा तयार करणेची जबाबदारी ग्रामसभा व ग्रामसभाद्वारे नियुक्त सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समितीस या कायद्याने देण्यात आली आहे.त्यानुसार आराखडा तयार करण्यात आला आहे.

## 1.2 पार्श्वभूमी

आज जल,जंगल व जमिनींचे हक्क व अधिकार ग्रामसकडे आले. त्यामुळे आम्ही खूपच हर्ष व्यक्त करीत आहोत.

आम्हाला असं वाटते,की आम्ही परकीय गुलामगिरीतुन मुक्त झालो की, काय?

भारत देश तर 15 ऑगष्ट 1947 ला स्वातंत्र झाला. तरी पण वनातला आदिवासी व इतर पारंपारिक वननिवासी हा स्वातंत्र्य झाला नाही. आम्ही जुलमी जिवन जगत होतो.

आम्ही व आमचे पूर्वज पिढ्यान् पिढ्या जंगलावर जीवन जगत होतो. तरही जंगलापासुन वंचित ठेवला गेला. पशु-पक्षी तरी निवारा शोधतात,पण आम्ही माणुस असुन सुद्धा आम्हाला निवारा पासून वंचित ठेवला गेला.आमच्या गरजा जंगलावर भागत होत्या, त्या तरी वनविभाग हिरावण्याचा प्रयत्न करीत होता. चोर तरी मान सन्मानाने जिवन जगत होता. पण आदिवासी व इतर पारंपारिक वननिवासीची नेहमी हेटाळणी होत होती.आम्हाला कधीच स्व:ताचा अस्तित्व नव्हता.

आम्हाला कधीही हकलपटी केली जात होती.कधी जल प्रकल्पाच्या नावाने,तर कधी लोह प्रकल्पाच्या तर कधी खनिज प्रकल्पाच्या नावाने. आम्हाला शब्द मांडण्यासाठी जागाच नव्हती.

म्हणुन आज पंचायत क्षेत्र विस्तार कायदा (पेसा)१९९६ व वनहक्क कायदा २००६ च्या अंतर्गत आज आदिवासी खऱ्या अर्थाने स्वांतत्र्य झाला म्हणावे लागेल.

जल, जंगल व जमीनीचे सामुहिक मालकीहक्क ग्रामसभेला मिळाले.

म्हणुन आज ग्रामसभा निमनवाडा आपल्या अस्तित्वाच्या लढाईची व हक्क अधिकाराची जाणीव ठेवून.पहिल्यादाच वनकार्याआयोजना तयार करीत आहे.

आम्हाला कोणत्याही गोष्टीचा पुरेपूर ज्ञान नाही. पण आम्ही एक दुसऱ्याकडून शिकण्याचा प्रयत्न करू.आम्हाला ६ मे २०१३ ला सामुहिक वनहक्काचे पत्रकाप्रमाणे १२५.३१ हे.आर.चौरस क्षेत्रफळ मिळाला आहे.त्यामुळे वनकार्याआयोजना तयार करून,ज्या वनस्पती दुर्मिळ किंवा नष्ट झालेल्या आहेत.तत्या लावण्याचा प्रयत्न करू. जमीनीची धूप थांबविण्यासाठी दगडी बंधारे,ग्याॅबीन बंधारे व चर खोदणी आणि जलसंधारणचे काम करू.पशु-पक्षीसाठी वनतळी बांधण्याचा प्रयत्न करू.शासनाच्या योजना पुरेपूर राबविण्याचे प्रयत्न करू.व आमच्या जल, जंगल व जमीनीचे संरक्षण, संवर्धन व व्यवस्थापन करुन. आमचे आर्थिक संसाधने व गौण उपज वाढविण्यासाठी प्रयत्न करू.

**आमची ग्रामसभा**

**ग्रामसभेचे नाव:-** निमनवाडा

**ग्रामपंचायत**: निमनवाडा

**तालुका:** धानोरा

**जिल्हा:** गडचिरोली

**सेन्सस कोड:** 538952

**अ.अक्षांश** : 20.326271N

**ब. रेखांश** : 80.211371E

**जोडपत्र दिनांक:** 06/05/2013

**वनाधिकार अभिलेख (जोडपत्र )**

| हक्क | होय/नाही | शेरा |
|---|---|---|
| 1) निस्तार हक्क | होय | निस्तार पत्रका प्रमाणे मान्य |
| 2) गौण वनोत्पादनावरील हक्क | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (ग) प्रमाणे मान्य |
| 3) अन्य सामूहिक हक्क जसे- अ) वापर किंवा हक्कदारी असलेले (जल)<br>ब) चराई ( जंगल) | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (घ) प्रमाणे मान्य |
| 4) जैविक विविधता, बौद्धिक संपत्ती व पारंपरिक ज्ञान यांच्या हक्कांची सुगमता. | होय | जैवविविधता कायद्यानुसार गठीत ग्रामस्तरीय समितीला हक्क |
| 5) अन्य पारंपरिक हक्क. | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (झ) प्रमाणे मान्य |



## 1.3 इतिहास

निमनवाडा हा फारच पुरातणीय गाव आहे.याचे इतिहास फारच रोमांचक आहे.९ व्या शतकात वैरागड येथे नागवंशीय माना जमातींचा राजाची सत्ता होती.चांदा जिल्ह्याच्या सेटलमेंट रिपोर्ट १८६९ मध्ये आहे.इ.स.१४५० पर्यत हा भाग माना जमातीच्या राजवटीत होते.विराट नगरीचे राजा विराट रूद्रधर हा" माना" जातीचा होता. आणि त्याच जातीचे माना लोक निमनवाडा हा गाव वसले.पुर्वी निमनवाडा हा गाव पाली नदीच्या काठावर वसलेले होते. आजही त्या गावढाणाला रिठा म्हणतात.तिथे आजही चिंचेचे झाडे"आहेत.आंबाचे" बन"आहे.त्याच्या विहीरी आज पुर्ण बुजल्या आहेत .विराट नगरी म्हणजे आजचे

वैरागड होय.इ.स.१४७१ मध्ये "हीरा"ची खाण सुरू करण्यात आली होती. त्यामुळे हीरा"च्या खाणीला संस्कृत मध्ये वैरागर किंवा वज्राकर असे म्हणत होते. आणि त्या ठिकाणी किल्ला पण आहे.त्यावरून वैरागड हे नाव पडले असावे.१३ व्या शतकात विराटनगरीवर चांदागढचे राजा खंडक्या बल्लाळशहाने स्वारी करून विराट राजाचा पराभव करून.त्याचा नामनिशान मिटविला,व "गोंड"राजाची सत्ता सुरू झाली.

निमनवाडा येथिल "माना"लोक त्या झुंजार लढाईत मारले गेले. त्याचा परिवारातील सदस्यना राजा खंडक्या बल्लाळशहाने हाकलून लावले. त्या काळापासून निमनवाडा ओस पडले होते. १८ व्या शतकात रघुजी भोसले, गोंड राजाचा पराभव करून मराठांची सत्ता स्थापन केली. १८१८ ते १८५३ मध्ये इंग्रजीनी मराठांच्या सत्ता नष्ट करून. इंग्रज राजवट लागू केली.तेव्हा इंग्रजांनी जमीनदारी पध्दत लागू केली.शेतसारा ,जंगलातील कर वसूल करण्यासाठी एक जमीनदारची नेमणुक करण्यात आले होते. वैरागड परगानचे तुकडे करून ४० गावचे एक ईलाका बनवले. नंतर गडचिरोली तालुक्यातील खैरी येथुन कुळमेथे कुळातील एक परधान जातीचा माणूस माणसावर मरी आली. सर्व गावकरी जिकडे तिकडे पळून गेले.व हा निमनवाडाला निघून आला. व हळूहळू रिश्तेदार नात्याने एक एक लोक निमनवाडा येऊन बसु लागले. आज निमनवाडामध्ये ५३ कुंटब आहेत.व २०११ च्या जणगणेप्रमाणे मतदार यादी नुसार २१२ आहेत. गावाला २०१३ ला सामुहिक वनहक्क १२५.५३ हे.आर क्षेत्रफळ मिळाला आहे. तसेच गावात तिनं बोअरवेल,सरकारी विहीर दोन वैयक्तिक विहीर दोन,शेतात विहीरी पाच, बोअरवेल तिन, गाव बोळया दोन खाजगी बोळया अकरा आहेत. पुर्व दिशेला जंगल व छोटीशी पाहडी आहे. पश्चिम दिशेला शेतजमीन आहे.उत्तर दिशेला पाली नावाची छोटीशी नदी व दक्षिण दिशेला जंगल आहे.

अश्याप्रकारे निमनवाडाचा इतिहास आहे.

## 1.4 गावाची प्राथमिक माहिती

| | |
|---|---|
| **गावाचे नाव** | निमनवाडा |
| **ग्रामपंचायत** | निमनवाडा |
| **तालुका** | धानोरा |
| **जिल्हा** | गडचिरोली |
| **गावातील कुटुंबाची संख्या- 54** | अनुसूचित जमाती (ST)- 54 |
| | |
| **पुरुष लोकसंख्या** | 136 |
| **स्त्री लोकसंख्या** | 141 |
| **एकूण लोकसंख्या** | 277 |
| **अनुसूचित जमाती लोकसंख्या** | 277 |

## 1.5 गावाची भौगोलिक माहिती

| अ. क्र. | खात्याचे प्रकार | क्षेत्र हे. |
|---|---|---|
| 1 | वन | 125 |
| 2 | झुडपी जंगल | 0 |
| 3 | आखर | 3 |
| 4 | गावठाण | 5 |
| 5 | तलाव/बोडी | 6 |
| 6 | मसानवट | 1 |
| 7 | ढोरफोडी | 1 |
| 8 | पाट | 6 |
| 9 | खातखुड्या | 0 |
| 10 | रस्ते | 3 |
| 11 | नदी/नाले | 2 |
| 12 | पोटखराब | 0 |
| | **एकूणक्षेत्र** | **152** |
| **अ. क्र.** | **खात्याचे प्रकार** | **क्षेत्र हे.** |
| 1 | बागायत | 0 |
| 2 | जिरायत | 125 |
| | **एकूण** | **125** |



## 1.6 गावाची व्यवसाया संबंधी माहिती

| व्यवसाय | कुटुंबाची संख्या |
|---|---|
| शेती | 52 |
| पशुधन | 54 |
| दुधाचा व्यवसाय | 0 |
| वनउपज गोळा करणारी कुटुंब | 54 |

## 1.7 पोलो – निसर्गाशी संबंधित सन

| नाव | वेळ | निसर्ग संपदा |
|---|---|---|
| बिजोरी | या | |

| | | |
|---|---|---|
| संजोरी पोलो. | संजोरी पोलो,ही दिवाळी झाल्यानंतरच साजरी केली जातो. | नवापोलो झाल्यानंतर म्हणजे नवा पोलो नवीन धान्य खाण्याची पोलो असते.त्यानंतर संजोरी पोलो केली जाते.धानाची मळणी करायचे असेल तर संजोरी करून धान चुरणा करतात.. |
| गोटया पोलो | नोव्हेंबर ते डिसेंबर महिन्यात म्हणजे आवळा परिपक्व झालेले असते. | गोटया पोलो, आदिवासी लोक निसर्गाला आणि धरतीला आईचा दर्जा दिला आहे.कुठलेही झाड हे धरतीवर उभे असते.म्हणुन कोणतेही फळ खाण्याचा असेल तर धरणी मायेची परवानगी घेऊनच तोडा लागते. म्हणुन गोटया पोलोच्या वेळी आवळा ची पुजा करुन ते आवळा देवाला अर्पण करून.नंतर जेवण करून घरी येतात. |
| अळी पोलो | शनिवारी धान रोवणी झाल्यावर. | धानावर निरनिराळे प्रकारचे रोग येतात.आणि हा निसर्गाचा कोप आहे.असे समजून शनिवारी धानावर कोणत्याही रोग येऊ नये म्हणून पाळला जातो. |
| हाडोक पोलो. | धान रोवणी संपले की हाडोक म्हणजे ऑगस्ट ते सप्टेंबर महिन्यात. | हाडोक पोलो,हाडोक म्हणजे दुष्काळ असा अर्थ होतो.पूर्वी खूप दुष्काळ पडत, असे अपुरे साधनांच्या अभावी ते घडत असे.त्यांना संपूर्ण जीवन निसर्गावर अवलंबून राहावे लागे.देवधान,मोहफुल,चार,टेबर व इतर कंदमुळं तेव्हा ते लोक निसर्गाला आराधना करत होती.ते निसर्गाला सांगत होते की हे देवा यंदा भरभरून जंगलातील फळ येऊ देत.आम्ही तुला बळी देतो. ही रीत रिवाजात बदली व रितीनुसार आजही पाडला जातो. |
| मंगळवार पोलो | जूलै ते ऑगस्ट महिन्यात. | पहिला पाऊस पडतो.तेव्हा अनेक बिमाऱ्या होतात.हिवताप, डोकेदुखी, सर्दी खोकला, होते. गायी, बैल,शेळीयाना तोंडी,चौकुरा इतर या सर्व बिमारी पासून सुटकारा मिळावा म्हणून मंगळवार पोलो ठेवले जाते. |
| डहुरपोलो | पहिला पाऊस पडतो तेंव्हा. | पहिला पाऊस पडतो तेंव्हा पुर्णतः पाणी दुषीत झालेला असतो.गायी बैल सर्व मोकळे असतात.ते बाहेर दुषीत पाणी पितात.पहिल्या पावसात नवीन जीव जंतूंचा प्रादुर्भाव झाला, असते.साथीचे रोग पसरतात. या पासून सुटकारा मिळावी म्हणून डहुरपोलो केली जाते. निसर्गाला आराधना केली जाते.कोंबडा,बकारा किं वा डुक्कर बळी दिला जातो. सर्व गावकरी सामुहिक जेवन केली जातो. |

## गावातील सामुहिक देवस्थान

| अ.क्र. | नाव | स्थान |
|---|---|---|
| 1 | नार माता/ गाव माउली/ माराई | गावात |
| 2 | गढ माता | जंगलात |
| 3 | पाट देव | जंगलात |

| | | |
|---|---|---|
| 4 | ठाकूर देव/चिकाटी/ भूम्याल / तल्लूर मुते | जंगलात |
| 5 | महादेव | गावात |
| 6 | भीम देव | गावात |

## 1.8 संघटन

गावामध्ये कोणतेही सामूहिक काम करायचे असल्यास त्यासाठी एखादी संघटना किंवा समिती असणे आवश्यक आहे. अन्यथा तो काम कधीच चांगला होत नाही कारण त्या कामावर कुणाचीही लक्ष राहत नाही.त्यामुळे गावामध्ये सुद्धा असे काही समित्या स्थापन करणे आवश्यक असते.

1) वनहक्क समिती
2) सनियंत्रण समिती
3) जैवविविधता समिती
4) बँकेच्या व्यवहारासाठी समिती
5) वेगवेगळे पास देण्यासाठी समिती
6) तंटामुक्त समिती

यासाठी योग्य व्यक्ती आणि गरजेनुसार समिती तयार करणे आवश्यक आहे.



## 1.9 इतर ग्रामसभा व महासंघाशी संबंध

प्रत्येक ग्रामसभा आप आपली संघटना तयार केली आहे.गावातील संघटना गावा पुर्ती मर्यादित असते. कोणतेही गौण उपज अधिकारा प्रमाणे ग्रामसभा करते.उदा.तेंदु व बांबू व इतर वनोपज,तर ठेकेदाराला या मालाची गरज असते.आपणाला माल विकण्याची गरज असते.कोणतेही गौण उपज काही विशिष्ट कालमर्यादा पर्यंत टीकु शकते.याची जाणीव ठेकेदाराला असते.आणि आपणाला असते.म्हणुन ठेकेदार मिळेल तेवढ्या कमी किमतीत उचलण्याचा प्रयत्न करतो कारण आपणाकडे साठवणूक साठी नाही. पण आपली दहा पंधरा गावाची एक संघटना असेल तर मात्र ठेकेदाराला पर्याय नसतो. त्याला माल घेणेच असतो.म्हणुन महासंघ तयार करणे आवश्यक आहे.

१) एक दुसऱ्याला मदत मिळते.व एक दुसऱ्या
पासून बरेच काही शिकायला मिळते.
२) ग्रामसभाचा महासंघ तयार झाला तर आपुलकी,स्नेह निर्माण होते.
३) ठेकेदार, व्यापारी, दलाल व राजकारणी लोकांपासून फसवणूकीचे धोका कमी असतो.
४) कोणतेही काम करायला सोपे जाते.उदा.तेंदु लिलावाची जाहिरात प्रसिद्ध करणे.खर्च कमी येतो.

म्हणुन इतर ग्रामसभा व महासंघाशीसंबंध ठेवणे योग्य आहे.

## 1.10 गावात असलेल्या सुविधा

गावातील सेवा, सुविधा आणि त्यांचे अंतर खालील प्रमाणे आहे–

| अ.क्र. | सुविधा व यंत्र संसाधन | हो/ नाही | अंतर |
|---|---|---|---|
| 1 | प्राथमिक शाळा | हो | गावात |
| 2 | अंगणवाडी | हो | गावात |
| 3 | गट ग्रामपंचायत कार्यालय | हो | गावात |
| 4 | आरोग्य उपकेंद्र | हो | 2 किमी |
| 5 | तलाठी कार्यालय | नाही | 5 किमी |
| 6 | स्वस्त धान्य दुकान | हो | गावात |
| | पोष्ट ऑफिस | | 5 किमी |
| | तालुका | | 17 किमी |
| | जिल्हा | | 36 किमी |

## 1.11 पशुधन माहिती

| अ.क्र. | पशुधनाचे प्रकार | संख्या |
|---|---|---|
| 1 | गाय- बैल | 270 |
| 2 | म्हैस- रेडे | 27 |
| 3 | शेळी/बकरे | 223 |
| 4 | कोंबडी | 500 |
| 5 | डुक्कर | 30 |

## 1.12 कृषी पिके हंगाम माहिती

| अ.क्र. | हंगाम | खरीप (हो/नाही) | रब्बी (हो/नाही) |
|---|---|---|---|
| 1 | धान | हो | हो |
| 2 | भाजीपाला | नाही | हो |
| 3 | तूर | नाही | हो |
| 4 | चना | नाही | हो |
| 5 | मुंग | नाही | हो |
| 6 | जवस | नाही | हो |
| 7 | उळीद | नाही | हो |
| 8 | मका | नाही | हो |

| | | | |
|---|---|---|---|
| 9 | शेंगदाणे | नाही | हो |

## 1.13 पावसाची सरासरी

| वर्ष | पाऊस (मी.मी.) |
|---|---|
| 2015 | 848 |
| 2014 | 1266 |
| 2013 | 2368 |
| 2012 | 1568 |
| 2011 | 1214 |
| 2010 | 1769 |
| 2009 | 1124 |
| 2008 | 1272 |
| 2007 | 1874 |
| 2006 | 1564 |
| 2005 | 1682 |
| 2004 | 1315 |



## 2. वन व्यवस्थापन आराखड्याविषयी

## 2.1 उद्देश आणि कृती

| उद्देश | कृती |
|---|---|
| 1) वनाचे संरक्षण करणे:- | 1. वनाचे वनव्यापासुन ऱ्हास थांबवणे.<br>2. निसर्गातून मिळणाऱ्या विविध लाभांना, गौण उपजांना वाढविणे व टिकवून ठेवणे<br>3.आपल्या जंगलातून चोरी होणाऱ्या मालाला रोख लावणे व दंडात्मक कार्यवाही करणे.<br>4.जंगल सौरक्षण साठी गावात नियमावली तयार करणे.<br>5.सीमांकन करणे.<br>6.रोपवाटिका तयार करणे.<br>7.औषधी वनस्पती व चराई साठी चारा तयार करणे.<br>8.वनस्पतींची यादी बनवणे.<br>9.वेगवेगळ्या भुदृश्यांची यादी बनवणे.<br>10.जंगलाचे शाश्वत पद्धतीने वापर करणे.<br>11.वेगवेगळ्या भुदृश्यांची नकाशे तयार करणे.<br>12वनस्पती लागवडी नंतर त्यांची निघा राखणे.<br>13.वृक्षांची दर हेक्टरी संख्येचा अंदाज काढणे. |

| | |
|---|---|
| 2) जंगलातील जैवविविधतेचे संरक्षण :- | 1) आपल्या जंगलातील जैवविविधतेचे नुकसान होत असल्यास त्यासाठी कृतिशील असणे.उदा. शिकार, अवैध मासेमारी असे अवैध काम होत असल्यास त्यास प्रतिबंध घालणे.<br>2) नष्ट होणाऱ्या वनस्पतींची कारणासहित नोंद ठेवणे |
| 3) स्थलांतर थांबवणे | 1) गावातील तरुण मुलं गावात काम नाही मिळत म्हणून बाहेर कंपनीमध्ये जातात परंतु ठेकेदाराकडून त्यांची फसवणूक होऊन वापस गावात येतात असे प्रकरण थांबविणे. तसेच<br>2) गावातील लोकांना बाहेर रोजगारासाठी जाण्याची वेळ येऊ नये यासाठी गावातच वर्षभर काम पुरले पाहिजे यासाठी वेळोवेळी रोजगार हमी किंवा इतर योजनेच्या माध्यमातून काम उपलब्ध करून देणे. |
| 4) रोजगार हमी योजना ग्रामसभा स्वतः राबवेल यासाठी प्रयत्न करणे. | वनहक्क च्या कलम ३(१)(e) नुसार रोजगार हमी यंत्रणा घोषित करणे. |
| 5) ग्रामसभेची फसवणूक टाळणे | 1) गौण वणोपजाची खरेदी ग्रामसभेतच करणे व ग्रामसभेतर्फे त्याची विक्री करणे.<br>2) गौण उपजांची मूल्यसंवर्धन व विक्री साखळी तयार करणे.<br>3) तेंदु व बांबू प्रक्रिया स्वतः ग्रामसभे मार्फत करणे.<br>4) गावात नियम तयार करणे,उदा,(ग्रामसभेचे , जंगलाचे, गौणउपज वापराचे, आर्थिक व्यवहार, निस्तार काढण्याचे ,इत्यादी) |



## 2.2 सामुहिक वनसंपत्ती क्षेत्राचा तपशील

**गावाच्या गावहद्दी येणाऱ्या वनक्षेत्राची माहिती खालील प्रमाणे-**

**A) कंपार्टमेंट नंबर तपशील :- 446**

**B) सर्व्हे नंबर तपशील:- 142, 44/1, 2, 4, 6, 7, 8/1, 9/1, 10/1, 11, 33, 35, 37, 39, 41, 42, 45/1, 47, 50/3, 57/2, 59, 109, 129, 133, 141.**

**C) वनक्षेत्राच्या चतु:सीमा ची माहिती -**

**पूर्व**- 447 (जंगल) दुसानटोला व शिवागाठ्ठा.
**पश्चिम**- 435 (शेती) बोरी
**उत्तर**– 444 (शेती) खेडी व कन्हाळगाव
**दक्षिण**- 448 (जंगल) बोरी.

## 2.3 सीमा व हद्दीची स्थिती

बंदोबस्त कायदाचे अंतर्गत ग्रामसभा निमनवाडाचे सर्व बाजूंनी सीमाहद्दी निश्चित करण्यात आले आहे.

१) निमनवाडा सिमाहद्दीचे सिमांकन करुन काही काही अंतरावर चांदी गोटे नावाचे दगड गाळले आहेत.
२) वनविभागाने शेतजमीन सोडून जंगलाच्या बाजुने पाट(TCM)खोदले आहे.व शेतजमीनच्या बाजुला सीमारेषा वरून पांदन रस्ते (कच्चा) रोड टाकला आहे.
३) वनविभाग मधोमध एक एक दगडी मुन्नारे तयार केले आहे.
४)सीमा हृददीवर जाडरेषा आखले आहे व दरवर्षी साफ केला जातो.
५)सीमाहद्दी बाबत कुठलेही भांडण नाही.कारण सर्व ग्रामसभेच्या सीमा हद्दी ठरलेल्या आहेत.

## 2.4 समुदायीक वन हक्क प्राप्त जंगलावरील सद्यस्थितीतील अडचणी व धोके

1) **आंतरिक धोके :-** वणवा, वृक्षतोड, अतिक्रमण,बिमारी, हवामान बदल

2) **बाह्य धोके:-** वणवा, वृक्षतोड,चोरी,



## 2.5 जमिनीचा वापर तक्ता:

| जमिनीचा वापर | |
|---|---|
| ग्रामपंचायत मालकीहक्क,बोळी२. | 10 |
| सरकारी (शाळा, अंगणवाडी, ग्रामपंचायत कार्यालय,पंपघर व इतर सरकारी इमारती. | 5 |
| आबादी(ग्रामपंचायत मालकीहक्क) | 7 |
| ढोरफोळी | 2 |
| आकर (आखुरपल्ला) | 2 |
| पट्टाची जागा (पटपल्ला) | 5 |
| स्मशानभूमी (विचपल्ला) | 7 |
| गावठाण (निमनवाडा) | 5 |
| जंगल | 200 |
| ग्रामसभा निमनवाडाच्या वनहक्क कायदा अंतर्गत ६मे २०१३ला सामुहिक वनहक्काचे जोडपत्रक ३मिळाले आहे.क्षेत्रफळ १२५ आहे.१) त्यापैकी शेतजमीन. | 100 |

## 2.6 भूभाग/जलभाग यादी

| तुकडा क्रमांक | भुदृश्य प्रकार | भूरचना |
|---|---|---|
| 9 | ३० शेती | सपाट |
| 8 | ८. मध्यम वृक्ष खडकाळ (मिश्र) | सपाट |
| 7 | ५.विरळ वृक्ष खडकाळ (मिश्र) | सपाट |
| 6 | १०. दाट वृक्ष डोंगराळ (मिश्र) | मध्यम चढ |
| 5 | ९. मध्यम वृक्ष डोंगराळ (मिश्र) | कमी चढ |
| 4 | ११. दाट वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 3 | ७. मध्यम वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 2 | ४. विरळ वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |
| 1 | १. खूप कमी वृक्ष मैदानी (मिश्र) | सपाट |

## 2.7 ग्रामसभेद्वारा सीमांकन केलेला नकाशा –



## 2.8 वनक्षेत्रातील टापू (पारंपारिक/विशिष्ट नावाने ओळखल्या जाणारी जागा) माहिती

१) कन्हार पल्ला. २) भंडरीन टक्का. ३) कुचगुठा कोहळा. ४) हिवुर पल्ला. ५) मोडेन टक्का. ६) लाट टक्का. ७) पेनगुडरा. ८) ढोरफोळी. ९) विचपल्ला.(स्मशानभूमी). १०) पटपल्ला. ११) दिप्पा पल्ला. १२) गावठाण. १३) शेती (जलदुश्य-तलाव,बोळी व नाला.)

## 2.9 वृक्षांचा विविध भूभागावर संख्यात्मक अंदाज

| **भुदृश्य प्रकार** | **१. खूप कमी वृक्ष मैदानी (मिश्र)** | | |
|---|---|---|---|
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | गराडी | 1.40658628 | 0.022666347 |
| 2 | चार | 0.70329314 | 0.139714246 |
| 3 | तेंदु | 3.5164657 | 0.641429648 |
| 4 | तेंदू | 1.40658628 | 0.047291515 |
| 5 | धावडा | 3.5164657 | 0.126103244 |
| 6 | बिजा | 4.92305198 | 1.064120648 |
| 7 | बीजा | 2.10987942 | 0.119739877 |
| 8 | बेहळा | 0.70329314 | 0.025878812 |
| 9 | भेरा | 1.40658628 | 0.037077667 |
| 10 | मोवई | 0.70329314 | 0.041392668 |
| 11 | मोहा | 10.5493971 | 1.339211753 |
| 12 | येन | 7.0329314 | 0.258765738 |
| 13 | रोहन | 1.40658628 | 0.086328002 |
| 14 | सेहना | 2.81317256 | 0.077854706 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **42.1975884** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **१०. दाट वृक्ष डोंगराळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | कसई | 61.5142268 | 0.783223462 |
| 2 | गराडी | 430.599588 | 7.075444946 |
| 3 | घोगर | 61.5142268 | 0.783223462 |
| 4 | चिचवा | 61.5142268 | 1.762252789 |
| 5 | धावडा | 123.028454 | 1.187073059 |
| 6 | पलंग | 123.028454 | 0.26874355 |

| | | | |
|---|---|---|---|
| 7 | बिजा | 123.028454 | 5.298996232 |
| 8 | साग | 246.056907 | 4.540248504 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **1230.284537** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **११. दाट वृक्ष मैदानी (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | आवळा | 22.5216875 | 0.286755031 |
| 2 | ऐन | 292.781937 | 5.353537207 |
| 3 | कसई | 22.5216875 | 1.294878187 |
| 4 | कुळा | 22.5216875 | 0.18352322 |
| 5 | गराडी | 225.216875 | 3.004296616 |
| 6 | घोगर | 22.5216875 | 0.362924336 |
| 7 | घोटी | 67.5650624 | 1.097734103 |
| 8 | चार | 45.0433749 | 0.664196341 |
| 9 | तेंदु | 45.0433749 | 0.649679367 |
| 10 | तेंदू | 22.5216875 | 0.040324926 |
| 11 | धावडा | 112.608437 | 3.342309108 |
| 12 | बिजा | 45.0433749 | 1.463167546 |
| 13 | भेरा | 112.608437 | 1.819819116 |
| 14 | मोका | 22.5216875 | 1.147020124 |
| 15 | मोवई | 45.0433749 | 2.621120205 |
| 16 | मोहा | 225.216875 | 9.653428897 |
| 17 | येन | 292.781937 | 6.514536639 |
| 18 | रोहन | 45.0433749 | 2.262676417 |
| 19 | साग | 247.738562 | 6.7663434 |
| 20 | सुर्या | 22.5216875 | 1.147020124 |
| 21 | सेहना | 360.347 | 7.301499977 |
| 22 | हिरडा | 22.5216875 | 0.040324926 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **2342.255497** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **३० शेती** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | चिचवा | 3.10098281 | 0.157931758 |
| 2 | जवळ झाड नाही. | 3.10098281 | 0 |

| | | | |
|---|---|---|---|
| 3 | परस | 9.30294843 | 0.111662688 |
| 4 | बिजा | 3.10098281 | 0.199882381 |
| 5 | बेहळा | 3.10098281 | 0.844564751 |
| 6 | मोहा | 21.7068797 | 1.77036565 |
| 7 | शेवडोर | 3.10098281 | 0.222708455 |
| 8 | साग | 15.5049141 | 0.355321778 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **62.01965621** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **४. विरळ वृक्ष मैदानी (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | एन | 0.47439718 | 0.007644644 |
| 2 | ऐन | 4.26957464 | 0.175668256 |
| 3 | कडुनिंब | 0.94879436 | 0.013684856 |
| 4 | कसई | 0.47439718 | 0.006345998 |
| 5 | खैर | 0.47439718 | 0.013590478 |
| 6 | गराडी | 0.47439718 | 0.007644644 |
| 7 | घोगर | 0.47439718 | 0.009437832 |
| 8 | चार | 1.89758873 | 0.059175207 |
| 9 | तेंदु | 1.89758873 | 0.040865813 |
| 10 | तेंदू | 0.94879436 | 0.089553701 |
| 11 | धावडा | 4.26957464 | 0.121022604 |
| 12 | परस | 4.26957464 | 0.125277783 |
| 13 | पळस | 0.94879436 | 0.037751328 |
| 14 | बाहवा | 1.42319155 | 0.032183007 |
| 15 | बिजा | 9.48794364 | 1.072537887 |
| 16 | भेरा | 15.655107 | 0.455960543 |
| 17 | भेरा | 0.47439718 | 0.006040213 |
| 18 | मोवई | 3.32078027 | 0.137656443 |
| 19 | मोहा | 26.5662422 | 2.026094912 |
| 20 | येन | 32.2590084 | 1.22072695 |
| 21 | रोहन | 8.53914928 | 0.47250695 |
| 22 | रौहन | 0.47439718 | 0.007988181 |
| 23 | लोखंडी | 0.47439718 | 0.007644644 |
| 24 | लोखडी | 0.47439718 | 0.006040213 |
| 25 | साग | 1.42319155 | 0.013590478 |
| 26 | सालई | 0.47439718 | 0.00339762 |

| | | | |
|---|---|---|---|
| 27 | सूर्या | 1.42319155 | 0.055320796 |
| 28 | सेहनना | 0.47439718 | 0.009437832 |
| 29 | सेहना | 5.69276618 | 0.119347049 |
| 30 | हलदु | 0.47439718 | 0.009437832 |
| 31 | हिरडा | 0.94879436 | 0.014303978 |
| 32 | हिवर | 0.94879436 | 0.05499991 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **132.831211** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **५.विरळ वृक्ष खडकाळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | काकई | 9.22024465 | 0.083155359 |
| 2 | कोजुब | 3.07341488 | 0.025044438 |
| 3 | गराडी | 6.14682977 | 0.088658287 |
| 4 | तेंदु | 6.14682977 | 0.099052707 |
| 5 | तेदु | 3.07341488 | 0.156527735 |
| 6 | धावडा | 18.4404893 | 0.297158121 |
| 7 | धावडी | 3.07341488 | 0.005502928 |
| 8 | बिजा | 15.3670744 | 0.428494674 |
| 9 | बेहळा | 3.07341488 | 0.198105414 |
| 10 | भेरा | 30.7341488 | 0.206054088 |
| 11 | मोवई | 3.07341488 | 0.015285912 |
| 12 | मोहा | 30.7341488 | 0.63831521 |
| 13 | येन | 15.3670744 | 0.315599045 |
| 14 | रोहन | 12.2936595 | 0.21094558 |
| 15 | सूर्या | 3.07341488 | 0.039131934 |
| 16 | सेहना | 18.4404893 | 0.126347231 |
| 17 | हिरडा | 3.07341488 | 0.029960387 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **184.404893** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **७. मध्यम वृक्ष मैदानी (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | कसई | 2.79178489 | 0.12357827 |
| 2 | काकई | 1.39589245 | 0.025593199 |

| | | | |
|---|---|---|---|
| 3 | कारारुक | 1.39589245 | 0.08025645 |
| 4 | कुंभी | 1.39589245 | 0.071092218 |
| 5 | कुळा | 1.39589245 | 0.019594793 |
| 6 | खैर | 1.39589245 | 0.027770398 |
| 7 | गराडी | 20.9383867 | 0.336854926 |
| 8 | गोगल | 1.39589245 | 0.017773055 |
| 9 | चार | 8.37535467 | 0.086921345 |
| 10 | जांभुळ | 1.39589245 | 0.08025645 |
| 11 | तेंदु | 5.58356978 | 0.37749968 |
| 12 | तेंदू | 2.79178489 | 0.090253793 |
| 13 | धावडा | 32.1055262 | 1.007376736 |
| 14 | धावडी | 1.39589245 | 0.017773055 |
| 15 | बांबु (रांजी) | 1.39589245 | 0 |
| 16 | बिजा | 19.5424942 | 3.390843333 |
| 17 | बीजा | 1.39589245 | 0.046931972 |
| 18 | बेल | 1.39589245 | 0.022494022 |
| 19 | बेहळा | 1.39589245 | 0.027770398 |
| 20 | भेरा | 29.3137413 | 0.759420407 |
| 21 | मोका | 2.79178489 | 0.164678459 |
| 22 | मोवई | 18.1466018 | 0.702457767 |
| 23 | मोह | 1.39589245 | 0.086021584 |
| 24 | येन | 118.650858 | 3.867516657 |
| 25 | रोहन | 19.5424942 | 0.751311451 |
| 26 | साग | 33.5014187 | 1.974242015 |
| 27 | सुर्या | 1.39589245 | 0.000106749 |
| 28 | सेहना | 16.7507093 | 0.371823411 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **385.2663149** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **८. मध्यम वृक्ष खडकाळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | कसई | 4.69996579 | 0.059841823 |
| 2 | कुळा | 4.69996579 | 0.006320793 |
| 3 | कोजुब | 4.69996579 | 0.093502848 |
| 4 | गराडी | 18.7998632 | 0.115943532 |
| 5 | घोगर | 4.69996579 | 0.183265583 |
| 6 | घोटी | 9.39993158 | 0.042076282 |

| | | | |
|---|---|---|---|
| 7 | चार | 9.39993158 | 0.074802279 |
| 8 | चिचवा | 4.69996579 | 0.008415256 |
| 9 | धावडा | 37.5997263 | 0.641429541 |
| 10 | धावडी | 14.0998974 | 0.144929415 |
| 11 | बिजा | 56.3995895 | 3.857703121 |
| 12 | भेरा | 75.1994526 | 0.980770078 |
| 13 | मोवई | 14.0998974 | 0.254327748 |
| 14 | मोहा | 23.4998289 | 0.278638488 |
| 15 | येन | 56.3995895 | 0.774652399 |
| 16 | रोहन | 4.69996579 | 0.014960456 |
| 17 | लोखडी | 9.39993158 | 0.045778995 |
| 18 | सुर्या | 9.39993158 | 0.146762071 |
| 19 | सूर्या | 4.69996579 | 0.012117969 |
| 20 | सेहना | 9.39993158 | 0.09552251 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **375.9972632** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **९. मध्यम वृक्ष डोंगराळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | कुदुरशी | 19.7798346 | 0.393507306 |
| 2 | कुदूरशी | 9.88991728 | 0.125922338 |
| 3 | गराडी | 39.5596691 | 0.37383194 |
| 4 | धावडा | 59.3395037 | 2.154452498 |
| 5 | बिजा | 69.229421 | 3.797660305 |
| 6 | भेरा | 79.1193383 | 1.338160944 |
| 7 | मोका | 9.88991728 | 0.125922338 |
| 8 | मोवई | 19.7798346 | 0.482046449 |
| 9 | येन | 19.7798346 | 0.322675991 |
| 10 | साग | 39.5596691 | 2.366946443 |
| 11 | सालई | 29.6697519 | 5.408757916 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **395.5966914** | |



## 3. वनहक्क अंतर्गत मिळणाऱ्या लाभांची गरज

# आणि वापर तपशील -

## 3.1 वनस्पती वापर तपशील

### शीट 1 (अन्न)

| क्र. | वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण (%) | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पती चा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | मोह | फुल,फळ | मार्च ते जून | 40 | 50 | 50 |
| 2 | चार | फळ | मार्च | 70 | 99 | 1 |
| 3 | येरोनी | फळ | डिसेंबर ते जानेवारी | 20 | 100 | |
| 4 | बोर | फळ | जानेवारी ते फेब्रुवारी | 90 | 50 | 50 |
| 5 | कुळा | फुल,शेंगा | जून ते जुलै | 70 | 75 | 25 |
| 6 | पिंपळ बार | फुल | जून ते जुलै | 30 | 75 | 25 |
| 7 | सफेद मुसळी | पान | जुलै अगस्त | 40 | 99 | 1 |
| 8 | कळू कांदे | कांदे | डिसेंबर ते जानेवारी | 26 | 99 | 1 |
| 9 | तरोटा | पान | जुलै | 34 | 25 | 75 |
| 10 | कडू भाजी | पान | मे ते जून | 32 | 99 | 1 |
| 11 | पार्सेला | फळ | जानेवारी ते फेब्रुवारी | 5 | 99 | 1 |
| 12 | बोराभाजी | पान | जुलै ते ऑगष्ट | 76 | 99 | 1 |
| 13 | आंबा | फळ | मे ते जून | 98 | 25 | 75 |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| 14 | आवळा | फळ | जानेवारी ते एप्रिल | 51 | 99 | 1 |
| 15 | उमरून | फळ | मे ते जून | 12 | 25 | 75 |
| 16 | कचर कांदे | कांदे | एप्रिल ते मे | 11 | 99 | 1 |
| 17 | कवठ | फळ | एप्रिल ते मे | 6 | 99 | 1 |
| 18 | कोयार भाजी | पान | जून | 91 | 99 | 1 |
| 19 | कोजूब | फळ | जून ते जुलै | 70 | 99 | 1 |
| 20 | खोबर वेल | मूळ | नोव्हेबर ते जानेवारी | 25 | 99 | 1 |
| 21 | गवतीचाय | पान | बाराही महिने | 2 | 1 | 99 |
| 22 | चिंच | फळ | मे ते जून | 80 | 25 | 75 |
| 23 | बोदेले | फळ | ऑक्टोंबर ते नोव्हेंबर | 80 | 70 | 30 |
| 24 | जांभूळ | फळ | जून ते जुलै | 80 | 70 | 30 |
| 25 | टेंभरून | फळ | एप्रिल ते मे | 90 | 99 | 1 |
| 26 | धोबे | पान | ऑगष्ट ते सप्टेंबर | 80 | 1 | 99 |
| 27 | बांबू | कोंब | ऑगष्ट ते सप्टेंबर | 98 | 99 | 1 |
| 28 | डुंबर सात्या | दांडी | ऑगष्ट | 98 | 99 | 1 |
| 29 | येरू सात्या | दांडी | ऑक्टोंबर | 86 | 99 | 1 |
| 30 | गुंजा | पान | डिसेंबर | 22 | 99 | 1 |
| 31 | सुरुंद कांदे | कांदे | नोव्हेंबर ते मे | 98 | 98 | 2 |
| 32 | वर | दांडी | जुलै ते ऑगष्ट | 86 | 99 | 1 |
| 33 | सेलवट | फळ | मार्च | 25 | 90 | 10 |
| 34 | अरकफरी | कोवळे पान | एप्रिल | 67 | 99 | 1 |

## 3.2 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 2 (चारा)

| क्र. | वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी वापर केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | पुतेर जाळी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 2 | जुनाक जप्पी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 3 | हिकुम जप्पी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 4 | पर्सेला | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 5 | बिलायकोजी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 6 | दुधूम | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 7 | बोराभाजी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 8 | कोरहुची | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 9 | उतरण वेल | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 10 | उमरून | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 11 | उरसुळी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 12 | एरोनी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 13 | कसई | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 14 | काटा भाजी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 15 | कुसार्या गवत | पान | जुलै ते ऑगष्ट | 90 | 10 |
| 16 | खोबरवेल | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 17 | गराडी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 18 | चिंच | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 19 | चिकना | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 20 | जंगली तूर | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 21 | जंगली मुंग | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 22 | जवेला | पान | जुलै ते ऑगष्ट | 90 | 10 |
| 23 | जांभूळ | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 24 | झिल्बुली | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 25 | डोर्ली वांगा | पान | जून ते मार्च | 90 | 10 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 26 | दुर्वा | पान | जून ते मार्च | 90 | 10 |

## 3.3 वनस्पती वापर तपशील

## शीट 3 (जाळाऊ लाकूड)

| क्र. | उत्पादन वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | गराडी | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 2 | येन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 3 | झिलबुली | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 4 | सिहाना | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 5 | भेरा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 6 | बिजा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 7 | आवळा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 8 | चारा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 9 | पळस | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 10 | धावळा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 11 | कुळा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |

## 3.4 वनस्पती वापर तपशील

## पत्रक 4 (घर बांधणी)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | साग | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 2 | बांबू | ओला बांबू | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 3 | येन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 4 | बिजा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 5 | गराडी | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 6 | सूर्या | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 7 | मोवई | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 8 | रोहणी | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 9 | हळदु | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |

## 3.5 वनस्पती वापर तपशील

## पत्रक 5 (कृषी अवजारे)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | साग | नांगर,दांडी | मे ते जून | 10 | 95 | 5 |
| 2 | बोरी | नांगर | मे ते जून | 3 | 95 | 5 |
| 3 | भेरा | नांगर,दांडी | मे ते जून | 25 | 95 | 5 |
| 4 | कोजूब | नांगर | मे ते जून | 36 | 95 | 5 |
| 6 | अंजन | नांगर, दांडी | मे ते जून | 40 | 95 | 5 |
| 7 | बिजा | नांगर, दांडी | मे ते जून | 5 | 95 | 5 |
| 8 | धावळा | दांडी | मे ते जून | 40 | 95 | 5 |

## 3.6 वनस्पती वापर तपशील

## शीट 6 (कुंपण घालणे)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | बांबू | ओला/सुका बांबू | मे ते जून | 97 | 95 | 5 |
| 2 | साग | वाळलेला लाकूड | मे ते जून | 50 | 95 | 5 |
| 3 | गराडी | वाळलेला लाकूड | मे ते जून | 55 | 95 | 5 |
| 4 | येन | वाळलेला लाकूड | मे ते जून | 45 | 95 | 5 |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| 5 | बिजा | वाळलेला लाकूड | मे ते जून | 44 | 95 | 5 |
| 6 | पळस | वाळलेला लाकूड | मे ते जून | 67 | 95 | 5 |
| 7 | रोहणी | वाळलेला लाकूड | मे ते जून | 70 | 95 | 5 |

## 3.7 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 7 (संस्कृती)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | कारण |
|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | |
| 1 | मोहा | पाने, फांदी, फुल,खोड | फरवरी ते जून | लग्नासाठी,पूजेसाठी |
| 2 | मोवई | खोड | फरवरी ते जून | लग्नासाठी |
| 3 | सालइ | खोड | फरवरी ते जून | लग्नासाठी |
| 4 | जांभूळ | फांदी | फरवरी ते जून | लग्नासाठी |
| 5 | कोजब | फांदी | फरवरी ते जून | लग्नासाठी |
| 6 | गोंगल | खोड | फरवरी ते जून | लग्नासाठी |
| 7 | येन | खोड, फांदी | फरवरी ते जून | लग्नासाठी, पूजेसाठी |
| 8 | आवळा | फळ | जानेवारी ते जून | गोट्या पोलो |
| 9 | बेल | पान | जून ते मार्च | पूजेसाठी |
| 10 | पळस | पान | बाराही महिने | पत्रावळी |
| 11 | कुळा | शेंगा, फुल, पाने | ऑगस्ट ते सप्टेंबर | पोळ्याच्या सणासाठी |
| 12 | शेतावरी | पान | ऑगस्ट | पोळ्याच्या सणासाठी |
| 13 | माहूर | पाने | फरवरी ते मार्च | पत्रावळी |
| 14 | तुळशी | पाने | बाराही महिने | पूजेसाठी |
| 15 | कडूनिंब | पाने, खोड | जानेवारी ते जून | लग्नासाठी, पूजेसाठी |
| 16 | देवधान | धान | ऑक्टोंबर ते नोव्हेंबर | सणासाठी |
| 17 | दुबारी | पाने | बाराही महिने | पूजेसाठी |
| 18 | शिंद | पाने | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 19 | उमरून | पाने, फळ | बाराही महिने | पूजेसाठी |
| 20 | आंबा | पाने, फळ | बाराही महिने | पूजेसाठी, खाण्यासाठी |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| 21 | करकरी | फुल | ऑगस्ट | पोळ्यासाठी |
| 22 | सुमगवत | गवत | जून ते मार्च | पूजेसाठी |
| 23 | हरदुली | पूर्णच | जून ते मार्च | पूजेसाठी |
| 24 | जोंदूरली | फळ, पान | जून ते मार्च | पूजेसाठी |
| 25 | चिला | पूर्णच | जून ते मार्च | पूजेसाठी |
| 26 | उतरण | पूर्णच | बाराही महिने | पूजेसाठी |
| 27 | गहू येल | वेल | बाराही महिने | पूजेसाठी |
| 28 | कोंबडा | फुल | जून ते मार्च | पूजेसाठी |
| 29 | दगड | फुल , पान | बाराही महिने | पूजेसाठी |
| 30 | जास्वंद | फुल, पान | बाराही महिने | पूजेसाठी |
| 31 | गुलाब | फुल | बाराही महिने | पूजेसाठी |
| 32 | झेंडू | फुल | बाराही महिने | पूजेसाठी |
| 33 | जाई | फुल | बाराही महिने | पूजेसाठी |

## 3.8 वनस्पती वापर तपशील

## पत्रक 8 (वन औषधी)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | हुप्पे तोकार | पंचांग | जानेवारी ते फेब्रुवारी | 95 | 5 |
| 2 | पदमाटी | कांदा | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 3 | सुपारमाटी | कांदा | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 4 | केहकामाटी | कांदा | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 5 | हादेमाटी | पंचांग | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 6 | नांगेलमाटी | पंचांग | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 7 | कांदाळ उल्ली | पंचांग | जून ते जुलै | 95 | 5 |
| 8 | कर्वूलमाटी | कांदा | जून ते जुलै | 95 | 5 |
| 9 | हिर माटी | पंचांग | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 95 | 5 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 10 | नसतोंडा | पंचांग | जून ते मार्च | 95 | 5 |
| 11 | अदरवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 12 | पार्सेला | पंचांग | ऑगष्ट | 95 | 5 |
| 13 | कटूल कोसा | पंचांग | जून ते मार्च | 95 | 5 |
| 14 | दुधूम | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 15 | नयनेंडी | पंचांग | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 16 | मस्या | साल | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 17 | डोकेमरा | साल | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 18 | हिवीर | मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 19 | मूसतुमीर | फळ | डिसेम्बर | 95 | 5 |
| 20 | तिरका | फळ | डिसेंबर ते मार्च | 95 | 5 |
| 21 | सिरेल | साल | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 22 | चंद्रीमरा | साल,मूळ | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 23 | नाचुम | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 24 | कोरकोट जपी | पान,मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 25 | बोराभाजी | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 95 | 5 |
| 26 | अडूळसा | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 5 | 95 |
| 27 | झरका | पंचांग | जून ते जुलै | 95 | 5 |
| 28 | कचर कांदे | कांदा | नोव्हेंबर ते जून | 95 | 5 |
| 29 | कडूनिम | पंचांग | बाराही महिने | 50 | 50 |
| 30 | करकरी (पोरा पुंगार) | पंचांग | ऑगष्ट | 50 | 50 |
| 31 | रक्त रोहणी | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 32 | कळंब | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 33 | कळूकांदे | कांदा | डिसेम्बर ते मार्च | 95 | 5 |
| 34 | कडूभाजी | पंचांग | डिसेम्बर ते मार्च | 95 | 5 |
| 35 | कवसकुरी | फळ | नोव्हेंबर ते मे | 95 | 5 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 36 | कसई | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 37 | कुकुरडा | पंचांग | ऑगष्ट ते नोव्हेंबर | 95 | 5 |
| 38 | कुळा | पंचांग | बाराही महिने | 45 | 55 |
| 39 | कोयार भाजी | मूळ,पान | जून | 95 | 5 |
| 40 | करू | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 41 | खैर | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 42 | कोजूब | साल,मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 43 | खोबरवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 44 | गराडी | साल,पान | बाराही महिने | 95 | 5 |
| 45 | गवती चाय | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 46 | गुळवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 47 | घंटा | फळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 48 | घोटी | फळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 49 | चिकना | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 50 | भूतगांजा | बीज | जून नोव्हेंबर | 95 | 5 |
| 51 | जोन्दुरली | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 52 | डिकेमाली | डींक | डिसेम्बर ते मार्च | 95 | 5 |
| 53 | देन्डोरा | पंचांग | ऑगष्ट ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 54 | डोर्ली वांगा | पंचांग | नोव्हेंबर ते मार्च | 95 | 5 |
| 55 | तुळशी | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 56 | तेंदू | पान | बाराही महिने | 95 | 5 |
| 57 | तेल दोडका | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 95 | 5 |
| 58 | दुर्वा | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 59 | देव तरोटा | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 95 | 5 |
| 60 | धावळा | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 61 | धोबा | पान | बाराही महिने | 95 | 5 |

